**सन २००९-१० मध्ये भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत केंद्र शासनाने मंजूर केलेला निधी खर्च करण्यासाठी अंमलबजावणीच्या मार्गदर्शक तत्वांना (write-up) मंजूरी देण्याबाबत..**

## महाराष्ट्र शासन
### आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्र. केंद्रीय- २०१०/प्र.क्र १९/ का-१९
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १६ ऑगस्ट,२०१०.

वाचा : १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. केंद्रीय- २००९ /प्र.क्र. ३२/ का-१७, दिनांक २६ मार्च, २०१०
२) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र.केंद्रीय-२००९/ प्र.क्र.५८/ का-८(४), दिनांक १५ मार्च,२०१०.
३) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र.केंद्रीय-२००९/ प्र.क्र.५८/ का-८(४), दिनांक ३ मे,२०१० व ५ जून,२०१०

**प्रस्तावना** :- सन २००९-१० मध्ये भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) अंतर्गत केंद्र शासनाने मंजूर केलेले रु. २०००.०० लक्ष एवढे अनुदान खालील योजनांसाठी आहरीत करण्यास शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. केंद्रीय- २००९ /प्र.क्र. ३२/ का-१७, दिनांक २६ मार्च, २०१० अन्वये मंजूरी देण्यात आलेली आहे :-

| अ.क्र. | योजना | आहरीत निधी (रू. लाखात) |
|---|---|---|
| 1 | Individual Lift Irrigation (Engine + HDDE Pipe + Electrification ) | 60.00 |
| 2 | Installation of Wind Solar PV Hybrid Green Energy System to Ashram School. | 200.00 |
| 3 | Construction of Girls hostels in Government Ashram Schools with rain water harvesting. | 1000.00 |
| 4 | Construction of wall compound for Ashram Schools. | 450.00 |
| 5 | EMRS Recurring grants | 290.00 |
| | TOTAL | 2000.00 |

वरील ५ योजनांच्या अंमलबजावणीची मार्गदर्शक तत्वे (write-up) मंजूर करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

..२

**शासन निर्णय** : शासन आता या निर्णयाद्वारे या सोबत जोडलेल्या परिशिष्टांनुसार खालील ५ योजनांच्या बाबतीत अंमलबजावणीची मार्गदर्शक तत्वे मंजूर करीत आहे :-

१. वैयक्तिक लाभाची लघु उपसा जलसिंचन योजना (इंजिन + एचडीडीइ पाईप + विद्युतिकरण).

२. आश्रमशाळेमध्ये सौरऱ्पवन संयुक्त उर्जा निर्मिती सयंत्राची उभारणी स्थापना करणे.

३. शासकीय आश्रमशाळांमध्ये मुलींसाठी रेनवॉटर हार्वेस्टींगसह वसतिगृहाचे बांधकाम करणे.

४. शासकीय आश्रमशाळांकरीता संरक्षक भिंतीचे बांधकाम करणे.

५. एकलव्य आदर्श निवासी शाळांना आवर्ती अनुदान उपलब्ध करणे.

२ मंजूरी देण्यात आलेल्या सदर अंमलबजावणीच्या मार्गदर्शक तत्वांनुसार (write-up) त्वरीत कार्यवाही करण्यात यावी व निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह विनाविलंब शासनास सादर करण्यात यावे.

३. हा शासन निर्णय राज्यशासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००८१६१८१६५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(सु. द. पडवळ)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण, पुणे.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/ नाशिक/ अमरावती / नागपूर.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हाकोषाधिकारी.
खाजगी सचिव, मा. मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई .
स्वीय सहायक, मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
सर्व सहसचिव / उपसचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
संगणक समन्वयक, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (का-१९).

CR 275(1)

शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. केंद्रीय-२०१०/प्र.क्र १९/ का-१९, दिनांक १६ऑगस्ट,२०१० सोबतचे

## परिशिष्ट -१

## भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) अंतर्गत योजना

<table>
<tr><td>१.</td><td>योजनेचे नांव</td><td>वैयक्तीक लाभाची लघू उपसा जलसिंचन योजना (इंजिन+एचडीडीइ पाईप +विद्युतीकरण)</td></tr>
<tr><td>२</td><td>योजनेतील युनिट संख्या.</td><td>४० लाभार्थी</td></tr>
<tr><td>३.</td><td>योजनेसाठी येणा-या खर्चाचे अंदाजपत्रक</td><td>प्रती लाभार्थी रुपये १.५० लक्ष याप्रमाणे एकूण ४० लाभार्थ्यांसाठी रुपये ६०.००लक्ष
<table>
<tr><td>अ.क्र.</td><td>प्रकल्प</td><td>लाभार्थी</td><td>अ.क्र.</td><td>प्रकल्प</td><td>लाभार्थी</td></tr>
<tr><td>१</td><td>नाशिक</td><td>२</td><td>१३</td><td>किनवट</td><td>२</td></tr>
<tr><td>२</td><td>कळवण</td><td>२</td><td>१४</td><td>नागपूर</td><td>२</td></tr>
<tr><td>३</td><td>नंदूरबार</td><td>२</td><td>१५</td><td>चंद्रपूर</td><td>२</td></tr>
<tr><td>४</td><td>तळोदा</td><td>२</td><td>१६</td><td>चिमूर</td><td>२</td></tr>
<tr><td>५</td><td>राजूर</td><td>२</td><td>१७</td><td>देवरी</td><td>२</td></tr>
<tr><td>६</td><td>शहापूर</td><td>२</td><td>१८</td><td>गडचिरोली</td><td>२</td></tr>
<tr><td>७</td><td>जव्हार</td><td>२</td><td>१९</td><td>अहेरी</td><td>२</td></tr>
<tr><td>८</td><td>डहाणू</td><td>२</td><td>२०</td><td>भामरागड</td><td>२</td></tr>
<tr><td>९</td><td>पेण</td><td>२</td><td></td><td>एकूण</td><td>४०</td></tr>
<tr><td>१०</td><td>धारणी</td><td>२</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>११</td><td>अकोला</td><td>२</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>१२</td><td>पांढरकवडा</td><td>२</td><td></td><td></td><td></td></tr>
</table></td></tr>
<tr><td>४.</td><td>योजना राबविणारी यंत्रणा</td><td>सबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प</td></tr>
<tr><td>५.</td><td>नियंत्रक अधिकारी</td><td>अपर आयुक्त, आदिवासी विकास</td></tr>
<tr><td>६.</td><td>योजनेचा उद्येश / हेतु</td><td>आदिवासी उपयोजना क्षेत्रातील भौगोलिक परिस्थितीमुळे, दुर्गमतेमुळे आणि अर्थिक अडचणीमुळे आदिवासी शेतकऱ्यास जमीन ओलीताखाली आणणे शक्य होत नाही. अशा शेतकऱ्यास त्याची स्वतःची जमीन सिंचनाखाली आणण्यास ५ ते १० अश्वशक्ती क्षमतेचा विजपंप व पाईपलाईन करीता पी.व्ही.सी. पाईप दिल्यास अशा शेतकऱ्याची शेतजमिन ओलीताखाली येवून त्याचा आर्थिक विकास होण्यास मदत होईल.</td></tr>
<tr><td>७.</td><td>योजनेची कार्यपध्दती</td><td>सदर योजनेसाठी ठरवून दिलेल्या लक्षांकाप्रमाणे लागणारा निधी सबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या अधिनस्त ठेवण्यात येईल.<br>सदर योजना राबविण्याची कार्यवाही करण्यापूर्वी निवडलेल्या योजनेच्या ठिकाणी विद्युत पुरवठा होवू शकतो किंवा नाही याबाबत विजमंडळाकडून दाखला प्रकल्प अधिकारी हे घेतील.<br>सदर योजनेसाठी उपलब्ध पाणी पर्याप्त आहे संबंधित</td></tr>
</table>

| | | |
|---|---|---|
| | | विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून दाखला प्रकल्प अधिकारी हे घेतील. तसेच आवश्यक परवानाही संबंधित विभागाकडून घेतील. त्यानंतर संबंधित प्रकल्प अधिकारी हे लाभार्थी निहाय अंदाजपत्रक तयार करतील व त्याची मान्यता संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांची घेतील.<br>विद्युत व पाणीची उपलब्धता व लाभार्थ्यांची निवड केल्यानंतर विजपंप व इतर साहित्य खरेदीची कार्यवाही करावी. विजपंप व इतर साहित्य दरकरारावर असल्यास खरेदीची कार्यवाही अपर आयुक्त, आदिवासी विकास हे त्यांच्या स्तरावर करतील. दरकरार अस्तित्वात नसल्यास आयुक्त, आदिवासी विकास यांनी आपल्या स्तरावर संस्थेची निवड व आवश्यक साहित्याची किंमत निश्चित करण्याची कार्यवाही करावी. वरील दोन्ही पध्दती मध्ये खरेदी आदेश देण्यापूर्वी निवडलेल्या संस्थेसोवत विहीत नमुन्यात दरकराराच्या अटी व शर्ती सह करारनामा करण्यात यावा. साहित्यपुरवठा लाभार्थ्याच्या निवडलेल्या ठिकाणापर्यंत करणे, साहित्य स्थापित (installation) करण्याची जबाबदारी, परीरक्षणाची जबाबदारी, दंडात्मक कार्यवाहीची तरतूद करारनाम्याच्या अटि व शर्तींमध्ये समाविष्ट करावी आणि त्या अटी व शर्ती प्रमाणे पुढील कार्यवाही करावी.<br>करारनाम्यानुसार साहित्य बरोबर, चांगल्या दर्जाचे आहे, परीरक्षण संस्थेकडून केले जाणार आहे, साहित्य बरोबर बसविण्यात आले आहे व त्याचा वापर होत आहे अशा स्वरूपाचे प्रमाणपत्र प्रकल्प अधिका-यांनी दिल्यानंतरच करारनाम्यातील अटी व शर्ती प्रमाणे प्रत्यक्ष रक्कमेचे प्रदान अपर आयुक्त यांच्याकडून करण्यात यावे. सदर सर्व कार्यवाहीचे नियंत्रण आयुक्त किंवा अपर आयुक्त स्तरावरून राहील. |
| ८ | योजनेचा कालावधी | १ वर्ष |
| ९ | योजनेच्या अटी शर्ती | १. लाभार्थी अनुसूचित जमातीचे वार्षिक रु.२००००/- च्या मर्यादेत उत्पन्न असलेले असावे तसेच त्याची जमीन कमीतकमी १ एकर असावी.<br>२. लाभार्थ्याची जमीन लाभक्षेत्रात असल्याबाबत त्याचे नांवे ७/१२ उतारा असणे आवश्यक आहे.<br>३.लाभार्थ्याच्या स्वतःच्या जमीनीत बोअरवेल नसावी.<br>४. पाण्याच्या स्त्रोताच्या क्षमतेसबंधी भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेचे प्रमाणपत्र घेणे आवश्यक आहे.<br>५.लाभार्थ्यास लाभ दिल्यानंतर आदिवासी विकास विभागाकडील केंद्रीय अर्थसहाय्य अंतर्गत योजना अश आशयाचे तपशिलवार नामनिर्देशक फलक तयार करुन दर्शन भागात लावणेत येईल. |

..३

| | | |
|---|---|---|
| | | ६. लक्षांक कमी जास्त करण्याचा अधिकार आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना राहील .<br>७. प्रकल्प अधिकारी योजनेचा आढावा घेवून मूल्यमापन करतील व प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त व अपर आयुक्त यांना सादर करतील. आयुक्तांकडून उपयोंगिता प्रमाणपत्र, आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्यात येईल. |

परिशिष्ट-२

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत योजना

| | | |
|---|---|---|
| ०१ | योजनेचे नांव | **आश्रमशाळेमध्ये सौर-पवन संयुक्त उर्जा निर्मिती सयंत्राची उभारणी स्थापना करणे.** |
| ०२ | योजनेचे युनिट संख्या | एकूण ६२ युनिट संख्या (किमान) |
| ०३ | योजनेचे अंदाजपत्रक | प्रती युनिट रुपये ३.२५ लक्ष प्रमाणे एकूण ६२ युनिटसाठी रुपये २००.०० लक्ष |

| अ.क्र | प्रकल्प | निधी | लक्षांक |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | ९.७५ | ३ |
| २ | कळवण | ९.७५ | ३ |
| ३ | तळोदा | ९.७५ | ३ |
| ४ | नंदूरबार | ९.७५ | ३ |
| ५ | यावल | ५.०० | २ |
| ६ | राजूर | ९.७५ | ३ |
| **एकूण अ.आ. नाशिक** | | **५३.७५** | **१७** |
| ७ | शहापूर | ९.७५ | ३ |
| ८ | जव्हार | ९.७५ | ३ |
| ९ | डहाणू | ९.७५ | ३ |
| १० | पेण | ९.७५ | ३ |
| ११ | घोडेगांव | ३.२५ | १ |
| **एकूण अ.आ. ठाणे** | | **४२** | **१३** |
| १२ | पाढरकवडा | ९.७५ | ३ |
| १३ | किनवट | ९.७५ | ३ |
| १४ | धारणी | ९.७५ | ३ |
| १५ | अकोला | ९.७५ | ३ |
| १६ | औरंगाबाद | ३.२५ | १ |
| **एकूण अ.आ. अमरावती** | | **४२.२५** | **१३** |
| १७ | नागपूर | ९.७५ | ३ |
| १८ | देवरी | ९.७५ | ३ |
| १९ | चंद्रपूर | ९.७५ | ३ |
| २० | चिमूर | ९.७५ | ३ |
| २१ | अहेरी | ३.२५ | १ |
| २२ | गडचिरोली | ९.७५ | ३ |
| २३ | भामरागड | ९.७५ | ३ |
| **एकूण अ.आ. नागपूर** | | **६१.७५** | **१९** |
| **एकूण** | | **२००.००** | **६२** |

| | | |
|---|---|---|
| वरील तक्त्यात युनिट खर्च रु. ३.२५ लक्ष धरण्यात आला आहे. सदर योजनेसाठी केंद्र शासनांची वेगळी योजना असून MEDA कडून राबविली जात आहे. त्या योजने खाली काही रक्कम केंद्र शासनाकडून दिली जाते. त्याचबरोबर यासाठी दरकरार आहे व संस्थेची मंजुर यादी आहे. त्यामुळे हा निधी MEDA ला वर्ग करावा व त्यामध्ये किती ठिकाणी प्रकल्प घेता येईल ही माहिती त्यांच्याकडून घ्यावी व त्यान्वये लक्षांक मध्ये सुधारणा करावी. MEDA सोवत ५ वर्षाचा देखरेख करारनामाही करावा. | | |
| ०४ | राबविणारी संस्था | महाराष्ट्र एनर्जी डेव्हलपमेंट एजन्सी (मेडा). |
| ०५ | नियंत्रक अधिकारी | आयुक्त, आदिवासी विकास, |
| ०६ | योजनेचा उद्येश | दुर्गम आदिवासी क्षेत्रातील आश्रमशाळांना १२-१२ तास भार नियमन, खंडीत विज पुरवठा अथवा कमी दाबाने विजपुरवठा या सारख्या समस्यांना कायमचे तोड द्यावे लागते. त्यामुळे अशा ठिकाणी विजेवर चालणारी उपकरणे, वाशिंग मशिन, विद्युत पंप, संगणक, दुरदर्शन आदि सुविधांपासून वंचीत रहावे लागते. शहरातील सर्व कामकाज संगणकाच्या माध्यमातून होत असल्याने आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना संगणकाचे प्राथमिक ज्ञान विजपुरवठया अभावी मिळू शकत नाही. त्यामुळे शहरातील विद्यार्थी आणि ग्रामिण क्षेत्रातील विद्यार्थी यांच्यामध्ये अद्ययावत माहिती व शिक्षणाची मोठी दरी निर्माण होते. परिक्षेच्या कालावधीत रात्री अभ्यास करणे शक्य होत नाही. परिणामतः निकालावर विपरीत परिणाम घडून येतो. या परिस्थितीवर मात करण्याकरीता प्रायोगिक तत्वावर आश्रमशाळेमध्ये सौर पवन संयुक्त उर्जा संयंत्राची स्थापना / उभारणी करावयाची आहे. |
| ०७ | योजनेची कार्यपध्दती | महाराष्ट्र एनर्जी डेव्हलपमेंट एजन्सी (मेडा) योजना राबवतील.<br>१. सबंधित प्रकल्प अधिकारी व मेडा प्राधिकरणाचे प्रतिनिधी हे संयुक्त सर्वेक्षण करुन निवडलेल्या शाळेतील यंत्र बसविण्यासाठी स्थान निश्चिती करतील.<br>२. प्रत्येक ठिकाणाप्रमाणे सयंत्र उभारणी करण्याकरीता सयंत्राची किंमत व अनुषंगीक खर्चाचा आढावा घेवून मेडा अंदाजपत्रक सादर करतील (दरकरारान्वये).<br>३. मेडा प्राधिकरण आणि अपर आयुक्त यांनी करार करणे अनिवार्य असेल शिवाय ५ वर्षाचा मेंटेनन्स कराराही करणे आवश्यक आहे.<br>४. दरकरारातील तरतूदींनुसार करारनामा करण्यात यावा. त्यात सर्व अटी व शर्तीचा समावेश असावा. साहित्यपुरवठा निवडलेल्या ठिकाणपर्यंत करणे, साहित्य स्थापित (installation) करण्याची जबाबदारी, परीरक्षणाची जबाबदारी, दंडात्मक कार्यवाहीची तरतूद करारनाम्याच्या अटी व शर्तीमध्ये समाविष्ट करावी.<br>५. करारनाम्यानुसार साहित्य बरोबर बसविण्यात आले आहे व त्याचा वापर होत आहे अशा स्वरूपाचे प्रमाणपत्र प्रकल्प अधिका-यांनी दिल्यानंतरच प्रत्यक्ष रक्कमेचे प्रदान MEDA |

..६

| | | |
|---|---|---|
| | | करतील हे करारनाम्यात समाविष्ट करावे.<br>६. वरील सर्व कार्यवाहीचे नियंत्रण आयुक्त किंवा अपर आयुक्त स्तरावरून करावे. |
| ०८ | योजनेचा कालावधी | १ वर्ष |
| ०९ | योजनेच्या अटी व शर्ती | १. ज्या शासकीय आश्रमशाळांमध्ये सदरची योजना राबवावयाची आहे अशा शाळांची निवड अपर आयुक्त, आदिवासी विकास करतील.<br>२ सदरची योजना राबवितांना अतिदुर्गम भागातील व स्वतःची जमीन असलेल्या तसेच संगणकाचा पुरवठा केलेल्या शासकीय आश्रमशाळेस प्राधान्यक्रम द्यावा.<br>३ ज्या शासकीय आश्रमशाळेत योजना राबविण्याचे निश्चित केले जाईल त्या शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थी निवास स्थानात प्रथम प्राधान्य देण्यात यावे.<br>४ लक्षांक कमी जास्त करण्याचा अधिकार आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना राहील.<br>५ मेडाकडून प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र संबंधीत प्रकल्प अधिकाऱ्यांकडे पाठविण्यात येईल व त्यानंतर प्रकल्प अधिकारी योजनेचा आढावा घेवून मूल्यमापन करतील व प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र अपर आयुक्त यांना सादर करतील व अपर आयुक्त त्यांचे कार्यक्षेत्रातील सर्व प्रकल्प अधिकारी यांचे एकत्रित प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त यांना सादर करतील. आयुक्तांकडून उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्यात येईल. |

**परिशिष्ट-३**

भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) अंतर्गत योजना

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव | **शासकीय आश्रमशाळांमध्ये मुलींसाठी रेनवॉटर हार्वेस्टींगसह वसतिगृहाचे बांधकाम करणे** |
| २ | योजनेतील युनिट संख्या | २० युनिट |
| ३ | योजनेसाठी येणाऱ्या खर्चाचे अंदाजपत्रक | एका वसतिगृहासाठी रु. ५०.००लक्ष याप्रमाणे एकूण २० वसतिगृहांच्या बांधकामाकरीता रु.१०००.०० लक्ष निधी |
| ४ | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ५ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास |
| ६ | योजनेचा उद्येश / हेतू | आदिवासी विकास विभागामार्फत चालविल्या जात असलेल्या काही शासकीय आश्रमशाळांना स्वतःची मालकीची इमारत आहे परंतू काही आश्रमशाळा हया भाडयाच्या इमारतीत सुरु आहेत. सध्याच्या काळात आश्रमशाळेमध्ये निवास व्यवस्था व वर्गखोल्या या दोन्हीही एकाच इमारतीत आहेत. अशा आश्रमशाळेच्या स्तरावर मुंलींच्या निवासाची स्वतंत्र अशी व्यवस्था उपलब्ध नाही. त्यामुळे मुलींना आरोग्य व शिक्षणाच्या बाबतीत अनेक समस्यांना सामोरे जावे लागत आहे. |
| ७ | शाळेची निवड | माध्यमिक शाळा अथवा कनिष्ठ महाविद्यालय अतिदुर्गम भागात व निवासाची समस्या असेल अशा ठिकाणी व स्वतःच्या मालकीची जागा असेल अशा आश्रमशाळेचे ठिकाण निवडण्यात यावे. सदर शाळेची निवड प्रकल्प अधिकारी स्वतः करतील. |
| ८ | योजनेची कार्यपध्द्ती | शासनाने विहीत केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करुन सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत कामे करुन घेण्यात यावीत. |
| ९ | योजनेचा कालावधी | १ वर्ष |
| १० | योजनेच्या अटी व शर्ती | १. ज्या ठिकाणी वसतिगृह बांधावयाचे आहे त्या शाळांची निवड अपर आयुक्त, आदिवासी विकास हे करतील. प्रकल्प अधिकारी हे त्यांच्या कार्यक्षेत्रात सदरच्या बांधकामाच्या पर्यवेक्षणाकरता समिती स्थापन करतील.<br>२. वरील समितीत सार्व. बांधकाम विभागाचे अभियंता, शासकीय माध्य. आश्रमशाळेचे मुख्याध्यापक व खाजगी क्षेत्रातील या क्षेत्राची तांत्रिक माहिती असणाऱ्या व्यक्तींचा समावेश असेल.<br>३. सदरची समिती ही इमारतीच्या बांधकामाची गुणवत्ता कायम ठेवण्यासाठी वेळोवेळी पाहणी करुन अहवाल प्रकल्प अधिकारी यांना सादर करेल. |

| | | |
|---|---|---|
| | | ४. बांधकाम पुर्ण झाल्यानंतर केंद्रीय अर्थसहाय्य योजना अंतर्गत निधीतून बांधकाम करण्यात आले अशा आशयाचे तपशिलवार नामनिर्देशक फलक तयार करुन दर्शनी भागात लावणेत येईल.<br>५.बांधकाम पुर्ण झाल्यानंतर कामाचे मूल्यमापन करून निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र व बांधकामाचे प्रगतीचा अहवाल प्रकल्प अधिकारी अपर आयुक्त व आयुक्त यांना सादर करतील. आयुक्तांकडून सदर बाबतीत उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्यात येईल. |

## परिशिष्ट- ४

भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) अंतर्गत योजना

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव | **शासकीय आश्रमशाळांकरिता संरक्षक भितीचे बांधकाम करणे.** |
| २ | योजनेतील युनिट संख्या | ३० शासकीय आश्रमशाळा |
| ३ | योजनेसाठी येणाऱ्या खर्चाचे अंदाजपत्रक | एका शासकीय आश्रमशाळेसाठी रु.१५.०० लक्ष खर्च याप्रमाणे एकूण ३० शासकीय आश्रमशाळांसाठी रुपये ४५०.०० लक्ष खर्च |
| ४ | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, सार्वजनिक बांधकाम विभाग/ बेरोजगार अभियंता संघटना/ नोंदणीकृत खाजगी ठेकेदार |
| ५ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास |
| ६ | योजनेचा उद्येश/हेतू | शासकीय आश्रमशाळेच्या जागेवर अतिक्रमण होवू नये व जंगली हिंस्त्र पशुपासून आदिवासी विद्यार्थ्यांचे संरक्षण होण्याचे दृष्टीने शासकीय आश्रमशाळांच्या सभोवताली संरक्षण भिंत बांधणे आवश्यक आहे. |
| ७ | शाळेची निवड | ज्या शाळांसाठी स्वतःची इमारत आहे तसेच शाळेच्या परिसरातच मोकाट गुरांचा त्रास होत असतो. अतिदुर्गम भागातील शासकीय आश्रमशाळेतील निवासी मुलांचे संरक्षण होण्याचे दृष्टीने शासकीय इमारती आहेत तथापी सभोवताली संरक्षण भिंत नाहीत अशा शाळांची निवड करण्यात येईल. |
| ८ | योजनेची कार्यपध्द्ती | शासकीय आश्रमशाळा हया निवासी शाळा असून मुलांचे संरक्षण होण्याचे दृष्टीने शाळेच्या सभोवताली संरक्षण भिंत बांधकाम प्रस्तावित आहे. सदर शाळांच्या ठिकाणी संरक्षण भिंत बांधकामासाठी सबंधित प्रकल्प अधिकारी यांनी सबंधीत सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडून अंदाजपत्रके प्राप्त करुन घ्यावीत व ती अपर आयुक्त यांचे मार्फत आयुक्तांकडे पाठविल्यांनतर आयुक्त यांचे मार्फत शासनास प्रशासकीय मंजुरीसाठी सादर केली जातील. प्रशासकीय मंजुरी प्राप्त होताच उपलब्ध निधी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग करुन कामे तातडीने सुरु केली जातील. |
| ९ | योजनेचा कालावधी | १ वर्ष |
| १० | योजनेच्या अटी व शर्ती | १. अंदाजपत्रके सार्वजनिक बांधकाम विभागाकडून बनवून घेण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी यांची राहील.<br>२. प्राप्त अंदाजपत्रकाची तपासणी करुन प्रकल्प अधिकारी |

| | | |
|---|---|---|
| | | यांच्या स्वाक्षरीसह अंदाजपत्रके सबंधीत अपर आयुक्त यांचे मार्फत आयुक्तालयास तात्काळ सादर करावीत.<br>३. आयुक्त, आदिवासी विकास यांनी अंदाजपत्रके तपासून प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर करावी.<br>४. मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांच्या मंजुरी अंती निधी सार्वजनिक बांधकाम विभागास वर्ग करावा.<br>५. बांधकाम मंजूर आराखडयानुसार झाल्याबाबत मुख्याध्यापक यांनी प्रकल्प अधिकारी यांना अहवाल सादर करावा. प्रकल्प अधिकारी यांनी बांधकाम पुर्ण झाल्याचे प्रमाणित करुन सार्वजनिक बांधकाम विभागाकडून उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन अपर आयुक्त यांना सादर करावे. अपर आयुक्त यांनी त्यांचे अधिनस्त सदर योजना / बाबींसाठी दिलेल्या निधीचे एकत्रित उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या बांधकामाबाबतच्या सद्यस्थितीचा अहवाल वेळोवेळी आयुक्तालयास सादर करावा.<br>६. संरक्षण भिंतीचे बांधकाम झाल्यानंतर सदरचे बांधकाम हे केंद्रशासनाच्या भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) अंतर्गत निधीतून करण्यात आले आहे या आशयाचा फलक इमारतीच्या दर्शनी भागात लावण्यात यावा.<br>७. कामाचे मूल्यमापन करून आयुक्त, आदिवासी विकास यांनी बाबनिहाय एकत्रित निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करावे. |

## परिशिष्ट-५

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत योजना

| अ.क्र. | योजनेचे नांव | **एकलव्य आदर्श निवासी शाळांना आवर्ती अनुदान उपलब्ध करून देणे.** |
|---|---|---|
| १ | एकूण संख्या | ४ एकलव्य आदर्श निवासी शाळा |
| २ | योजनेवरील खर्च | प्रति. शाळा रु.७२.५० लक्ष या प्रमाणे ४ शाळेचा खर्च रु.२९०.०० लक्ष |
| ३ | राबविणारी संस्था | महाराष्ट्र ट्रायबल पब्लीक स्कुल सोसायटी, नाशिक |
| ४ | नियंत्रण आधिकारी | आयुक्त, आदिवासी विकास, म.रा.नाशिक |
| ५ | योजनेची आवश्यकता | वेतन, प्रवास, कार्यालयीन खर्च, आहार इ. आवश्यक खर्च भागविणे तथा एकलव्य आदर्श निवासी शाळा सुरळीत पणे चालविणे करीता. |
| ६ | योजनेची कार्यपध्दती | केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचने प्रमाणे |
| ७ | योजनेचा कालावधी | सन २००९-१० |
| ८ | योजनेच्या अटी व शर्ती | १)सदस्य सचिव महाराष्ट्र ट्रायबल पब्लीक स्कुल सोसायटी नाशिक यांचे नियंत्रण राहिल.<br>२)नियमीत वेतन देणेसाठी रकमेचा उपयोग केला जाईल.<br>३)सदरचा खर्च आवश्यक शैक्षणिक हेतूसाठी करण्यात येईल<br>३)योजना राबविण्या-या संस्थेकडून (महाराष्ट्र ट्रायबल पब्लीक स्कुल सोसायटी, नाशिक) विहित प्रपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह आयुक्तांमार्फत शासनास सादर केले जाईल. |

